# (३) अधिक पद्यें.

## १. द्रौपदीस्वयंवराख्यान.

पृष्ठ १३ पद ९० तिसऱ्या कडव्यापुढें:—

मौन्यें पुढिलां दाविति बोटें । 'कां बसले? न उठा?' ।
'अशक्त लागोनि व्यथा खोटी.' । 'कां बसले? न उठा?' ।
'आमुचेन तंव वदवेना ओंठीं' । 'कां बसले? न उठा?' ।
'उठती तिडका माझ्या पोटीं' । 'कां बसले? न उठा?' ॥ ४ ॥

## ९. गजगौरीव्रताख्यान.[1]

पृष्ठ ७९ साकी ३ च्या पुढें:—

रत्नसिंहासनिं **गां**धारी मग बसवी योगाधीशा ।
षोडश उपचारें त्या पूजुनि तोषवि वस्त्राभूषा ।
कांहीं श्रीकर व्रत सांगुनियां तोडविं या भवपाशा ।
नित्यानंदा! सुखकंदा! वा! पुरवीं माझी आशा ॥
सांगें सुव्रत कांहीं हो! । भव हा तरणें नाहीं हो! ॥ २ ॥

पृष्ठ ७६ साकी ४ च्या पुढें:—

ऐसें सांगुनि भवगजकेसरि गेला स्वसुख बोधें ।
वीणा पाणीं नामस्मरणीं नाचे जो निजछंदें ।
दर्शनमात्रें त्रिताप हरती कलिमल होती शुद्धें ।
निजदैवें हा लाभ जयावरि पावति जे निजस्वपदें ॥
**र**मारमण ज्याचे हो । पतीतपावन साचे हो ॥ ४ ॥
ऐसें असतां स्वसुख बोधें । वर्षर्तू तो आला ।
**भा**द्रपदीं **ह**स्तनक्षत्रीं रविदिन शुद्ध उदेला ।
कृष्णपक्ष तो सुमुहूर्तांशीं **ना**रद सांगुनि गेला ।
बोलावुनि पुत्रा **गां**धारी म्हणे मान्य करा मम बाला! ॥
आणा सर्वहि हो! माती । बरवा करवा रे! हस्ती. ॥ ५ ॥
एकोत्तर शत मिळोनि गेले सर्वहि अरण्यवासा ।
खाणुनि माती केली गोळा अणिला पर्वत जैसा ।
सर्व मिळोनी केला हस्ती **ऐ**रावत शिशु जैसा ।

---

१. ह्या काव्यांतील साक्या राघवकविकृत व पद वस्वलिंगकृत आहे. ह्या काव्यांत ह्या परिशिष्टांतील अधिक साक्या मिळविल्या म्हणजे राघवकृत साकीबद्ध 'गजगौरीव्रताख्यान' पुरें होतें. राघव व वस्वलिंग या कवींनीं केलेलीं काव्यें कोणी लेखकानें एके ठिकाणीं मिळविल्यामुळें अशी गडबड झाली.

सालंकृत विधिमंत्रें पूजुनि **गां**धारिस म्हण बैसा ॥
बरवीं दीजे वाणें हो! **कुं**तिशि लाजिरवाणें हो! ॥ ६ ॥

पृष्ठ ७६ साकी ७ च्या पुढें:—

ऐसें व्रत **गां**धारी कथितां **कुं**ती सखेद चित्तीं ।
अत्रीनंदन परमाल्हादें पंचपुत्र मज देती ।
पांच गोळे माती आणुनि हस्ती कैसा करती? ।
पुत्रवती **गां**धारी म्हणुनी या जगीं केली ख्याती ॥
दैवें अपुल्या यावें हो! । म्यां कवणातें रुसावें? हो! ॥ ८ ॥
जरि मी वाणें घेऊं हीचीं देऊं कवण्या जन्मीं? ।
म्हणुनी बाहेर नयेचि **कुं**ती लज्जा झोंबे वर्मीं ।
**गां**धारी घरिं टाकुनि वायन अहंकारें दशमी (?) ।
धन्य जगीं मी मानि श्लाघ्यता पुत्रवती ते हो! मी ॥
ऐसी ती अभिमानेसीं । गेली निजभुवनासीं ॥ ९ ॥
इकडे **पां**डवकुलवल्ली झांकलि कळली असतां ।
पुत्रवती **गां**धारि म्हणावी, व्यर्थ मि **पां**डुवनिता ।
येरिति क्लेशा मानुनि हर्षाविरहित केली चिंता ।
वनांत **पां**डव खेळुनि पारध **भीम** पुढें ये त्वरिता ॥
नलिनी जिवनाविण ती हो! । तैसी झाली **कुं**ती हो! ॥ १० ॥
पूर्णचंद्र अमावास्या येउनि उडुगणें प्रकाश केला ।
अस्ताचळिं रवि हर्षें येउनि पूर्णादरें उदेला ।
कां क्षिरसागर दैत्या मारूं क्षीराब्धि घरीं आला ।
केंवि घडे हें सांग तुं जननी! सिंह तो कांपे गजाला ॥
मजला सांगें तूं माय! । **भीम** धरी दृढ पाय ॥ ११ ॥

पृष्ठ ७८ साकी १८ च्या पुढें:—

लिहिलें पत्रहि भूपसुरेशा भूषामंगलधामा ।
वाणाग्रीं स्थापुनियां सुदृढ बोले **य**दुवरनामा ।
घेउनि **गां**डिव वोढी काढुनि धाडी **अ**मरग्रामा ।
कीं तो **ख**गवर ज्यापरि पावे अमृतप्रचुरकर्मा ॥
तैसा शर पथ पावे हो! । जेथें विबुध बसावे हो! ॥ १९ ॥

पृष्ठ ७८ साकी १९ च्या पुढें:—

घेउनि पत्रिका वाचे **सु**रगुरू सुक्षत्रिया गुरूवचना ।
'स्वस्तिश्रीसालंकृत देवराया! दीनोद्धरणा! ।
**पा**कशासना! अमरआसना! कृपा करीं मज दीना ।
संकट मम मातेशीं पडलें यास्तव लिहिली सुचना ॥

कुलेश पाणी नमना हो! । साष्टांगेसी जाणा हो! ॥ २१ ॥
ऋषि **नारद** व्रत सांगुनि गेला मातेप्रति दिनबंधू ॥
नेणो जन्म पुढील कवणा कारण हा निजबोधू ।
पुढील जन्मीं प्राप्त होय हा **ऐ**रावत अगाधू ।
...................................... ॥
पुरवीं **कुं**तीव्रता हो! । धाडा **ऐ**रावता हो! ॥ २२ ॥

पृष्ठ ८० साकी ३० च्या पुढें:—

**पा**र्थें नमिलें त्या **कुं**तीतें सद्गुरु **धर्मा**सहितें ।
अठवुनि **कृ**ष्णचरणां **गां**डिव धरिलें हातें ।
केली स्वर्गापासुनि वाट बांधुनि शर दृढ पंथें ।
पुन्हा बाण पत्रिका लिहुनियां पाठवितो **अमरातें** ।।
लिहिलें, शरपथ केला हो! । धाडा **ऐ**रावताला हो! ॥ २९ ॥
**शु**कारि म्हणे **श**क्राधीशा! **पा**र्थें अघटित करणी ।
केली कीं हे स्वर्गापासुनि पायवाट ते धरणी ।
आतां तुम्ही काय पहातां आणा दिग्गज खाणी ।
तव साक्षेपें शृंगारुनियां **अमरा**वतिचीं लेणीं ॥
कैचें या भूलोकीं हो! । **पा**र्थें आणिलें त्यासी हो! ॥ ३० ॥
देउनि ऐसें पत्र **भी**मा पाठविलें सुरनाथा ।
जाउनि **भी**में नमन केलें त्या म्हणे **वा**युसूता! ।
काय म्हणउनी येणें केलें तें मज सांगें आतां ।
तंव तो बोले **वृ**कोदर, 'जाणुनि कां हो! वेडे होतां? ॥
कोठें दिग्गजखाणी हो! । तें मज सांगा स्वामी हो! ॥ ३१ ॥
ऐकुनि बोले **सह**स्राक्ष क्रूर **ऐ**रावत आहे ।
धरूं जातां **भी**मसेन तो शष्टायन पाडूं पाहे ।
बांधुनि चारी पाय गदा ती घालुनि खांदीं वाहे ।
देखुनि आश्चर्य करिती **सु**रगुरु धन्य म्हणे, 'तव बाहो!' ॥
सोडा **ऐ**रावताला हो! । मानें न्या तुम्हि त्याला हो! ॥ ३२ ॥

पृष्ठ ८० साकी ३३ च्या पुढें:—

**अ**र्जुन म्हणे जननी! आज तूं पाहें अपुल्या नेत्रीं ।
स्वर्गींचा **ऐ**रावत प्रचंड चालवितो धरत्रीं ।
तरि **पं**डूकुमर आम्हीं म्हणवितों किं क्षत्री ।
नाहीं तरि वृथाचि भूभार वागवितों स्वक्षेत्रीं ॥
ऐसा केला म्यां पण हो! । नलगे आतांही क्षण हो! ॥ ३४ ॥

पृष्ठ ८० साकी ३५ च्या पुढें:—

मग ती ब्राह्मणसुवासिनीसी घेउनि जाते गजरें ।

नाना वाद्यें वाजति तेथें नेत्रधामही न पुरे ।
सुरवर घेउनि पुष्पें वर्षति सुमनवृष्टिसी भारें ।
पुत्रवती कुंतीसी म्हणती त्रिजगीं कीर्ति प्रसारे ॥
स्वर्गीं देव पहाती हो! । सुंदर कीर्ति गाती हो! ॥ ३६ ॥

## १३. परमप्रकाश.[1]

पृष्ठ १२४ ओवी ११ च्या पुढें:—

एक अष्टांगयोग साधिती । एक पंचाग्निधूम्रपान करिती ।
एक ऊर्ध्व बाहू करिती । परि वस्तु न पावती येणेंकरून. ॥ १२ ॥

पृष्ठ १२८ ओवी ४२ च्या पुढें:—

ऐसा तो सद्गुरू तत्पर जाण । ऐसा प्रवर्ते नित्य तें ध्यान ।
स्वरुपीं असावें तल्लीन । ती उघडीं समाधी शिष्यराया! ॥ ४४ ॥

---

१. ह्या ग्रंथाचें 'पावनप्रकाश' असेंही दुसरें नांव आहे.

